अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन चालू शैक्षणिक वर्षापासून दत्तकला कॉलेज ऑफ फार्मसी, पुणे या संस्थेतील फार्म.डी.या अभ्यासक्रमास शासनाची मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक टीईएम-२०१९/प्र.क्र.३२०/तांशि-४,**
४ था मजला, विस्तार भवन, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक : २४ मार्च, २०२२.

**वाचा :**
१) सदस्य सचिव, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.Western /१-४२५९४५३१३०/२०१९/EOA,दि.३०/०४/२०१९.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.टीईएम-२०१९/प्र.क्र.१३०/तांशि-४, दिनांक १०/०६/२०१९.
३) संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र. २/एनजीसी/मान्यता/२०१९/१२८७, दिनांक २०/०९/२०१९.
४) संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र. २/एनजीसी/मान्यता/२०१९/१४९३, दिनांक १८/११/२०१९.
५) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे क्रमांक (ST.) ९२५१५/२०२० या रिट याचिकेत दिनांक १५ /०१/२०२१ रोजीचे आदेश.
६) फार्मसी कौन्सिल ऑफ इंडिया,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.०२.३४२/२०२१-PCI, दिनांक ०४.०३.२०२१.
७) संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र. २/एनजीसी/मान्यता/२०२/३३०, दिनांक २६/०३/२०२१.

**प्रस्तावना :**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी संदर्भाधिन क्र.१ येथील दि.३० एप्रिल, २०१९ च्या पत्रान्वये दत्तकला कॉलेज ऑफ फार्मसी, पुणे या संस्थेतील "डॉक्टर ऑफ फार्मसी" (फार्म.डी.) या अभ्यासक्रमासाठी ३० प्रवेश क्षमतेस शैक्षणिक वर्ष २०१९-२० करीता मान्यता दिलेली आहे. तथापि, या संस्थेस फार्मसी कौन्सिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली या संस्थेची मान्यता नसल्याने शासनाने या संस्थेच्या या अभ्यासक्रमास मान्यता दिलेली नव्हती. तथापि, शासनाची मान्यता नसतानाही या संस्थेमध्ये फार्म. डी. अभ्यासक्रमासाठी शैक्षणिक वर्ष २०१९-२०२० मध्ये १५ विद्यार्थ्यांचे प्रवेश झाले होते. सदर संस्थेने फार्मसी कौन्सिल ऑफ इंडिया या संस्थेने मान्यता द्यावी, याकरीता मा.मुंबई उच्च न्यायालयाकडे रिट याचिका क्रमांक ९२५१५/२०२० दाखल केली. सदर याचिकेत मा.उच्च न्यायालयाने दिनांक १५/०१/२०२१ रोजी अंतरिम दिलेल्या आदेशानुसार फार्मसी कौन्सिल

ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांचेस्तरावरील Executive committee यांचे दिनांक ०४/०३/२०२१ रोजीच्या बैठकीत “15 students admitted during 2019-20 academic session can be transferred to other approved institutions having infrastructure and MOU with hospital with regard to internship infrastructure so that students can get training as per statutory provision of Pharm.D. Regulations, 2008.”, असा निर्णय घेतला आहे. त्यानुसार संचालक, तंत्र शिक्षण यांनी दिनांक २६/३/२०२१ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन अभ्यासक्रमास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

मा.मुंबई उच्च न्यायालयाने रिट याचिका क्रमांक ९२५१५/२०२० मध्ये दिनांक २१/९/२०२० रोजी दिलेल्या अंतरिम आदेशानुसार फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांच्या मान्यतेच्या अधिन राहून दत्तकला कॉलेज ऑफ फार्मसी, पुणे या संस्थेतील “डॉक्टर ऑफ फार्मसी” (फार्म.डी.) या अभ्यासक्रमासाठी केवळ शैक्षणिक वर्ष २०१९-२० करीता १५ विद्यार्थी क्षमतेसह प्रथम वर्ग व केवळ शैक्षणिक वर्ष २०२०-२१ करीता १५ विद्यार्थी क्षमतेसह व्दितीय वर्ग सुरु करण्यास आणि पीसीआय च्या दिनांक ०४/०३/२०२१ च्या निर्णयानुसार संचालक, तंत्र शिक्षण यांना पुढील कार्यवाही करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

२. सदर अटी व शर्ती खालीलप्रमाणे आहेत :-

१) सदर मंजूरी कायम विनाअनुदान तत्वावर राहील.

२) प्रस्तुत बाबतीत फार्मसी कौन्सिल ऑफ इंडियाने वेळोवेळी विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

३) संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

४) संबंधित अधिनियमातील तरतुदीनुसार विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थाने आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

५) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास विहित मानकांनुसार पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत, त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

६) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके विद्यापीठ अनुदान आयोगाच्या प्रचलित मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

७) रॅगिंग संदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.
८) याशिवाय संबंधित विद्यापीठाने घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.
९) संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केली नसल्यास संस्थेकडून संचालकांनी अंतीम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी.
१०) सदर संस्था वरील अटी व शर्तीचे तंतोतंत पालन करते हे सुनिश्चित करण्याची जबाबदारी विद्यापीठाची असेल. कायदेशीर बाबींच्या पूर्ततेअभावी वरील अभ्यासक्रमात प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांचे शैक्षणिक व आर्थिक नुकसान होणार नाही, या संदर्भातील दक्षता विद्यापीठाने घ्यावयाची आहे. यात कसूर झाल्यास विद्यापीठाची सर्वस्वी जबाबदारी राहील.
११) संचालक, तंत्र शिक्षण यांना या मान्यतेच्या अनुषंगाने आवश्यक त्या इतर अटी व शर्ती विहित करता येतील.
१२) हे आदेश मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या रिट याचिका क्रमांक ९२५१५/२०२० मधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३२४११३७०४९४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by NITIN JYOTINATH GHIRATKAR
Date: 2022.03.24 16:26:52 +05'30'

**( नि.ज्यो.घिरटकर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, पुणे.
३) कुलसचिव, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे.
४) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जि.रायगड.
५) प्राचार्य, दत्तकला कॉलेज ऑफ फार्मसी, पुणे (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
६) अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली ११०००१.
७) सहाय्यक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्य बळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), नवी दिल्ली.
८) विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डिंग, दुसरा मजला, चर्चगेट, मुंबई.
९) प्रबंधक, फार्मसी काउन्सिल ऑफ इंडिया, कम्बाईन्ड काऊन्सिल बिल्डींग, कोटला रोड, ऐवान-ए-गालिब मार्ग, नवी दिल्ली -११०००२.
१०) निवडनस्ती/तांशि-४.